**राज्यात COVID-१९ मुळे उद्भवलेली परिस्थिती व त्याअनुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत सुरु असलेल्या रस्त्यांच्या योजनेतर (Non-Plan) कामांच्या नियोजनाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग,**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०२०/प्र. क्र.४८/रस्ते -१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १८ मे, २०२०

**प्रस्तावना :-**

सद्य:स्थितीत देशावर व पर्यायाने राज्यावर COVID-१९ या विषाणूमुळे उद्भवलेले संकट, परिणामी अर्थव्यवस्थेवर झालेला दुष्परिणाम याबाबी विचारात घेता विकास कामांच्या दृष्टिकोनातून नियोजन करणे आवश्यक झालेले आहे. सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत शासन स्तरावर मा.मंत्री (सा.बां.) यांनी राज्यातील रस्ते व पूल यांच्या द्विवार्षिक देखभाल दुरुस्ती (AMC) व विशेष दुरुस्ती तसेच पूरहानी दुरुस्ती अंतर्गत मंजूर कामांचा व प्रगतीपथावरील कामांचा प्रादेशिक विभाग निहाय आढावा सर्व प्रादेशिक विभागाच्या मुख्य अभियंत्यांसमवेत स्वतंत्रपणे सादरीकरणाद्वारे घेतला आहे. सदर आढाव्यादरम्यान सर्व मुख्य अभियंता यांनी त्यांच्या अडचणी मा.मंत्री ( सा.बां.) यांच्यासमोर मांडल्या. ३०५४ - रस्ते देखभाल व दुरुस्ती, पुरहानी दुरुस्ती, द्विवार्षीक देखभाल दुरुस्ती अंतर्गत मंजूर झालेल्या कामांची संख्या, सद्य:स्थितीत या कामांची उर्वरित किंमत (Spill Cost) व या तुलनेत प्रत्येक आर्थिक वर्षात प्राप्त होणारा व्यस्त प्रमाणातील निधी विचारात घेता ३०५४ - रस्ते देखभाल व दुरुस्ती, पुरहानी दुरुस्ती, द्विवार्षीक देखभाल दुरुस्ती अंतर्गत मंजुर असलेली कामे निश्चित केलेल्या उद्दिष्टांप्रमाणे पुर्ण शक्य होणार नाही असे नमुद करून रस्त्यांच्या योजनेतर धोरणात्मक निर्णय घेण्याची आवश्यकता सर्व मुख्य अभियंत्यांनी बैठकीदरम्यान मांडलेली होती.

तसेच जुनी spill over ची कामे सुरक्षीत स्तरावर आणुन बंद केल्यास दायीत्व कमी होईल असे सर्व प्रादेशिक मुख्य अभियंता यांनी आढावा बैठकांमध्ये सुचविले होते.

त्यानुषंगाने सन २०१९-२० या आर्थीक वर्षात COVID-१९ मुळे सर्वसाधारपणे २० ते २५ टक्के कमी उपलब्ध झालेली तरतुद सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात देखील COVID-१९ प्रादुर्भावामुळे राज्याच्या आर्थीक स्थितीवर झालेला परिणाम याचा विचार करून रस्ते व पुल यांच्या देखभाल दुरुस्ती/ विशेष दुरुस्ती इत्यादी योजनेतर कामांवरील दायित्व टप्प्याटप्प्याने कमी करण्याच्या दृष्टीने मंजुर केलेल्या कामाच्या अनुषंगाने धोरणात्मक निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

३०५४ - रस्ते देखभाल व दुरुस्ती, पुरहानी दुरुस्ती, द्विवार्षीक देखभाल दुरुस्ती अंतर्गत मंजूर कामांची संख्या व सद्य:स्थितीतील त्यांची उर्वरित किंमत (Spill Cost), भाववाढीमुळे जुन्या कामांच्या किंमतीत झालेली वाढ विचारात घेता शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे :-

(१) **विशेष दुरुस्ती कार्यक्रम (SR)** - विशेष दुरुस्ती कार्यक्रमातील कामे योजनेतर लेखाशीर्ष ३०५४ अंतर्गत मंजूर करण्यात आली आहेत. तरी मार्च २०१९ पूर्वी मंजूर करण्यात आलेली जी कामे अद्याप सुरू झालेली नाहीत ती कामे यापुढे हाती घेण्यात येऊ नयेत व त्यांचे जॉब क्रमांक रद्द करावेत. तसेच

प्रगतीपथावरील कामे सुरक्षीत स्थितीत ( Safe Stage) आणून ती बंद करण्यात यावीत व अंतीम देयक पारीत करून दायीत्वाची माहीती शासनास सादर करण्यात यावी. त्यानुसार कार्यवाहीपर अहवाल मुख्य अभियंता यांनी शासनास सादर करावा.

(२) **पूरहानी दुरुस्ती कार्यक्रम** (FDR) - पूरहानी दुरुस्तीची कामे योजनेतर लेखाशीर्ष ३०५४ अंतर्गत मंजूर करण्यात आली आहेत. यातील पूल दुरुस्तीची कामे वगळून जी कामे अद्याप सुरू झालेली नाहीत, ती कामे यापुढे हाती घेण्यात येऊ नयेत व त्यांचे जॉब क्रमांक रद्द करावेत. तसेच प्रगतीपथावरील कामे सुरक्षीत स्थितीत ( Safe Stage) आणून ती बंद करण्यात यावीत व अंतीम देयक पारीत करून दायीत्वाची माहीती शासनास सादर करण्यात यावी. त्यानुसार कार्यवाहीपर अहवाल मुख्य अभियंता यांनी शासनास सादर करावा.

(३) उपरोक्त सुचना विशेष दुरुस्ती अंतर्गत पुलांच्या दुरुस्तीची कामे, द्विवार्षिक देखभाल दुरुस्ती व दि. ११/०१/२०१९ च्या शासन निर्णयानुसार हाती घेण्यात आलेल्या रस्ते सुरक्षा संबंधीतील कामांना लागु रहाणार नाहीत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००५१८१६३५१६८६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TOPALE SURENDRA LAXMAN

Digitally signed by TOPALE SURENDRA LAXMAN
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=3b60595b1215fb700aff96f68466c3b3f17b82848a5ea51adaba226ddaf16dc9,
postalCode=400032,
street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=82b155e59050cd82b8c843990e099a4b42f5a1ceb428147d1cfff2eff00b3a4b,
ou=PUBLIC WORKS , o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=TOPALE SURENDRA LAXMAN
Date: 2020.05.19 12:17:50 +05'30'

**( सुरेंद्र टोपले )**
**उप सचिव (रस्ते), महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
३. मा.अपर मुख्य सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
४. मा.महालेखापाल (ले. व अ.), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
५. मा.महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
६. सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सचिव (बांधकाम), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
८. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, महाराष्ट्र राज्य.
९. सर्व सह सचिव / उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, महाराष्ट्र राज्य.
११. सर्व अवर सचिव / कक्ष अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, महाराष्ट्र राज्य.
१३. निवडनस्ती.